जी माहिती मला मिळवतां आली तीवरून मला वाटते तशी हकीगत लिहितों.

गेल्या २७ तारखेस वर उल्लेखिलेल्या तिघांनीं संध्याकाळी जाळें पाण्यांत टाकलें आणि मचवा परत आणला. परंतु अंधार पडल्यावर क्रूमे बूर्थकडे येऊन म्हणूं लागला कीं ज्या अर्थीं वादळ होणार असें वाटत आहे त्या अर्थी आपण जाऊन जाळें काढून आणावें हें चागले. असें पुष्कळदां होतें कीं वादळ झालें म्हणजे पक्की टाकलेलीं जाळीं सुटून समुद्रांत वाहात जातात. बूथचें जाळे अगदीं नवें कोरें असल्यामुळें तें वाहून गेल्यास त्याचें मोठें नुकसान होणार होतें

खरें म्हणजे वादळ आल्यासारखें कुणालाही वाटत नव्हतें. परंतु वर सांगितल्याप्रमाणें क्रूसेचें डोकें आतांशा ठिकाणावर नाहीं. तो कांहीं केल्या आपलें म्हणणे सोडीना; व त्याच्यासारख्या म्हाताऱ्या माणसाला अंधारांत एकटें जाऊं देणें धोक्याचें वाटल्यावरून बूर्थ व हाईन हे दोघेही त्याच्याबरोबर मचव्यांतून गेले.

सुमारें तासानंतर मात्र वादळ खरोखरीच सुरू झालें; आणि तें इतक्या प्रचंड जोराचें कीं, असें वादळ या खाडींत आमच्या आठवणींत झालेलें नाहीं. वादळाचा जोर विलक्षण होता एवढेंच नव्हे तर त्याची दिशाही सारखी आणि वेगानें बदलत होती. मध्यरात्रीच्या सुमारास वादळ जरासें थंडावलें; परंतु मचवा परत आला नाहीं हें पाहून हिलेवाकटच्या लोकांनीं इथले इनामदार हेर फॉन फालेन यांचे वाफारें काढून समुद्रात हाकारलें.

त्यांना बरेंच आंत गेल्यावर बूर्थचा मचवा मोठ्या समुद्राकडे वाहत चाललेला आढळला. जाळ्याची नासधूस झालेली होती परंतु तें मचव्यांत ठेवलेलें होतें. मचव्याचीं शिडें आवरलेलीं होतीं. हाईन फॉस चिंब भिजून गेला होता आणि कपाळावर मोठी जखम झाल्यामुळें बेशुद्ध झाला होत . ज्योआकिम बूर्थ मचव्यांत नव्हता, आणि त्याचें प्रेत अजूनही सापडलें नाहीं.

हाइन फॉस सांगतो कीं वादळांत सापडून त्यांचा मचवा ल्यूटे गांवच्या खडकाकडे वेगानें जाऊं लागला. मचवा उलटूं नये म्हणून त्यांनीं शिडें आवरलीं आणि कसेंहीं करून मचवा खडकाच्या विरुद्ध दिशेकडे न्यावा म्हणून वल्हीं मारण्यास प्रारंभ केला. त्या झंझावातांत आणि अंधारांत त्याला स्वतःला जाळें मुळींच दिसलें नाहीं. समुद्र तर एखाद्या खवळलेल्या प्रचंड भोंवऱ्यासारखा वाटत होता. त्याला एवढेंच आठवतें कीं एका क्षणीं मचवा इतका झुकला कीं त्याला वाटलें तो उलटला. शिडाच्या खांबावर तो फेकला गेला, त्याच्या डोक्यावर जबरदस्त आघात झाला आणि तो खालीं पाण्यांत पडला. पुढें काय झालें तें त्याला माहीत नाहीं.

क्रूमे आतांशा बरेच दिवस भ्रमिष्टासारखें करीत असे, आणि परवाच्या रात्रीनंतर तर तो पुरताच वेडा झाला आहे. परंतु त्या प्रसंगाची हकीगत तो सांगतो ती अशी, कीं बूर्थनें दोनदां समुद्रांत उडी घेतली. एकदा हाइन फॉसला वाचविण्यासाठीं, आणि मग पुन्हा मचव्याला अड-कलेलें जाळें त्याला दिसलें तें आंत ओढून घेण्यासाठीं. हें करतांना तो दोनदां वर आलेला दिसला, परंतु नंतर तो खालीं गेला तो गेलाच.

बूर्थ पटाईत पोहणारा होता हें खरें, परंतु केवळ जाळें काढण्यासाठीं त्यानें आपला जीव धोक्यांत घातला असेल हें विश्वसनीय वाटत नाहीं, परंतु जाळें ज्या अर्थी मचव्यांत सापडलें त्या अर्थी क्रूमे सांगतो तें खरें असलें पाहिजे, व आपल्या सवंगड्यांना वांचविण्याचा व जाळें काढण्याचा प्रयत्न करीत असतांच बूर्थ प्राणाला मुकला असें म्हटलें पाहिजे.

हिलेवाक्ट, हिलेनब्रुक आणि ल्यूटे या गांवातल्या साऱ्या लोकांना मनस्वी दुःख झालेलें आहे. निष्ठा, स्वार्थत्याग, आणि इतरांच्या हितासाठीं कष्ट करण्याची तयारी हें बूर्थचे विशेष गुण होते. या गुणांच्या आचरणांत त्याचें सर्व आयुष्य गेलें, आणि ते आचरितांनाच त्याला मृत्यु आला.

' गेल्या कित्येक वर्षांत माझे व बूर्थचे संबंध बरेचसे जिव्हाळयाचे झाले होते, आणि त्याचें पूर्वचारित्रही मला थोडेंसें माहीत होतें. या नात्यानें माझें वैयक्तिक मत म्हणून मी नमूद करूं इच्छितों कीं ज्या प्रकारें तो जगला आणि ज्या प्रकारें अखेर मेला त्यायोगें त्याच्या हातून घडलेलें पापकृत्य पूर्णांशानें धुतलें गेलें.

(सही) मोलर
हिलेन्‌ब्रुकचा बेलीफ."

— समाप्त —